२१९

201102041541220001 पुणे महानगरपालिका

खाजगी संस्थांना विहित मर्यादेपलिकडील द्यावयाच्या अनुदानास मंजूरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र.पीएमसी ३०९४/९८/प्र.क्र.१९/९४/नवि-२२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ दिनांक :- ११ फेब्रुवारी १९९४

संदर्भ :- १] शासन परिपत्रक जीईएन १६८७/५२९/प्र.क्र.५३/नवि-२४, दिनांक ३१.३.१९८९

२] शासन परिपत्रक जीईएन १०९१/३२/प्र.क्र.१/९२/नवि-२४ दिनांक १८.२.१९९२

३] आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे क्र. म.आ./१०७३ दिनांक ४.१.१९९४

प्रस्तावना :- शासन परिपत्रके, नगर विकास विभाग, क्रमांक जीईएन १६८७/५२९/प्र.क्र.५३/नवि-२४, दिनांक ३१.३.८९ अन्वये महापालिकेने तिच्या क्षेत्रातील खाजगी संस्थास अंशदान देण्याच्या मर्यादा विहित करण्यात आल्या आहेत. यामधील तरतुदीनुसार महापालिका एका आर्थिक वर्षात जास्तीत जास्त रु. २० लाख एवढे अंशदान खाजगी संस्थांना देऊ शकत होत्या २० लाखाची मर्यादा शासनाच्या क्रमांक जीईएन १०९१/३२/प्र.क्र.१/९२/नवि-२४, दिनांक १८.२.१९९२ च्या परिपत्रकाने वाढविण्यात आली असून ती ३० लाखाची करण्यात आली आहे. सन १९९३-९४ या आर्थिक वर्षात पुणे महानगरपालिकेने सदर मर्यादा ओलांडली असल्यामुळे व आचार्य अत्रे विकास प्रतिष्ठान, पुरंदर या संस्थेला रक्कम रु. ४ लाख ४६ हजार देणगी द्यावयाची असल्यामुळे एक "खास बाब" म्हणून मंजूरी देण्याबाबत महापालिका सभा ठराव क्रमांक ४८० दिनांक २१.१२.१९९३ अन्वये प्रस्ताव मान्यतेकरिता शासनास सादर केला आहे.

शासन निर्णय :- आयुक्त, पुणे महानगरपालिका यांच्या वरील संदर्भाधीन क्रमांक ३ येथील प्रस्तावातील आचार्य अत्रे

क्र.मा.प.

विकास प्रतिष्ठान, पुरंदर या संस्थेस रु. ४ लाख ४६ हजार देणगी एक " खास बाब" म्हणून शासन मंजूरी देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ दा. पुं. धात्रक ]
महाराष्ट्र शासनाचे सह सचिव

प्रति,

आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे

आचार्य अत्रे विकास प्रतिष्ठान, पुरंदर, जिल्हा पुणे.

टिडीसी/११२२४